# सौष्ठव



संपादक
श्रीधर तिळवे

6मार्च-21मार्च 1999
सौष्ठव अंक चौथा

# सौष्ठव

संपादक : श्रीधर तिळवे

सहाय्यक संपादक : मंगेश बनसोड



## संपादकीय

सौष्ठवचा हा तिसरा सहअंक. खरंतर ह्यातील मटेरियल साहित्य संमेलनाच्या अंगाने प्रसिध्द करण्याचा मानस होता पण अपरिहार्य कारणात्सव उशीर होत आहे. त्यामुळे आता संमेलनानंतर हा अंक येत आहे.

आम्ही ह्या मुख्य साहित्यसंमेलनावर बहिष्कार घालणं अपरिहार्य होतं कारण प्रश्न आविष्कार स्वातंत्र्यांचा होता. मी विद्रोही साहित्यसंमेलनाला हजर होतो. मंगेश बनसोड मात्र प्रत्यक्ष सहभागी झाला कारण त्यानं आंबेडकरवादाचा पूर्ण स्वीकार केला आहे. मला काहींनी विचारले की तू डावा आहेस म्हणून हजर आहेस का? ह्या पध्दतीचा प्रश्न येतो तेव्हा विद्रोह हा फक्त डाव्यांनी करायचाच उद्योग आहे अशी त्यामागं भावना असते. मी कोणत्याही अर्थाने डावा नाही, माझ्या परिवर्तनवादाला एक समग्रता आहे. अध्यात्मिक पातळीवर मी आंबेडकरांनी गौरवलेल्या ब्रम्हवादी (ब्राम्हणवादी नव्हे) व आंबेडकरांनी स्विकारलेल्या बौध्द वर्णीय (जातीय) पातळीवर फुले आंबेडकरवादी तर आर्थिक बाबतीत जिला मी मानवतावादी भांडवलवाद म्हणतो ह्यांच्यातून प्रेरणा घेतलेल्या नव्या परिवर्तनवादाचा पुरस्कर्ता आहे. परिवर्तनवादाची पारंपरिक मांडणी मोडून काढून पूर्णपणे नवीन मांडणी करायला हवी ह्या निष्कर्षाला मी पोहचलो आहे. माझ्या मते धार्मिक मूलतत्ववाद जितका प्रगतीला धोकादायक तितकाच मार्क्सवादासारखा विचारप्रणालीय मूलतत्ववाद (Ideological Fundamentalism) धोकादायक आहे. त्यामुळेच डाव्यांनी भरवलेली संमेलने ही मला फारशी पुरोगामी वाटत नाहीत. दलीत पददलीतांची परिस्थिती ही फक्त मानवतावादी भांडवलवादातूनच सुधारू शकेल असं मला वाटतं साम्यवादानं आमच्या ह्या वर्गाचं फक्त दारिद्र्यच वाढवलं आहे.

आम्ही गंगाधर पानतावणेंना जागा न सोडता स्वत:च अध्यक्ष बनलेल्या वसंत बापट ह्यांचा निषेध करतानाच त्यांनी शेवटी का होईना पण ठाकरेंविरूध्द आवाज काढून साने गुरुजींची अब्रू राखली ह्याबद्दल अभिनंदन करतो. ह्या साहित्य संमेलनाचा चेहरा मात्र ब्राम्हणीच होता. गं. ना. जोगळेकर ह्यांनी नेमाड्यांना कोषातले ठरवून टीका केली, त्याला संजय पवार ह्यांनी नेमाडे निदान कोषात तरी आहेत पण तुम्ही तर त्याही कोष अवस्थेपर्यंत प्रगती केलेली नाही त्याचे काय? असे विचारून योग्य उत्तर दिले. दलीत, आदिवासी, ग्रामीण ह्या सर्वांनी साहित्यातून राजकारणच केले असाही सूर ह्या संमेलनात लागला म्हणजे ब्राम्हण सोडून सगळ्यांनी साहित्यात राजकारण केले असाच एकंदर नूर. आता असा सूर लावल्यानंतर ह्या साहित्य संमेलनाला ब्राम्हणांनी ब्राम्हणांसाठी घातलेले महाभोजन असे कुणी म्हटले तर त्यात काय चुकले. लोकहितवादी,

आगरकर ह्यांच्याकडून ब्राम्हण काहीच शिकलेले दिसत नाहीत असं कुणी म्हटलं तर काय चुकलं? वस्तुस्थिती अशी आहे की १९६० नंतर ब्राम्हण वर्णाची साहित्यातली दादागिरी संपुष्टात आली आहे. त्यामुळे आज अनेकांच्या पोटात दुखतं. ह्यांना आम्ही सांगू इच्छितो की साठोत्तरी साहित्यानंतरही भाऊ पाध्ये, दिलीप चित्रे, अरूण कोलटकर वगैरे ज्या ब्राम्हणांनी बहुजनसमाजाशी नाळ जोडली त्यांचा मन:पूर्वक स्वीकार बहुजन समाजाने केला आहे. आजही बहुजन समाज साहित्याची सुरवात ज्ञानेश्वरांपासूनच करतो. आमचा विरोध ब्राम्हण्याला आहे. अपघाताने त्या वर्णात जन्मलेल्या माणसांना नाही आणि जे लोक ब्राम्हण्याला विरोध करण्याऐवजी त्या वर्णात अपघाताने जन्मलेल्या माणसांना करतात ते माझ्या मते ब्राम्हण्यवादी आणि जातीयतावादीच आहेत. मग ते कुठल्याही जातीजमातीत जन्मलेले असोत. अलीकडे अविनाश धर्माधिकारी केवळ अपघातानं ब्राम्हण जातीत जन्मलेत म्हणून आकस बाळगून तुम्ही संबंध तोडा असं सांगणारेही महाभाग मला भेटलेत. आमच्या मते हाही जातीयवादच आहे.

विद्रोही साहित्य संमेलनवाल्यांच्या पुढे आम्ही एक अर्थशास्त्रातली आकडेवारी ठेवतो. ती गिरीश वासूदेव ह्यांनी ८ फेब्रुवारी महाराष्ट्र टाईम्स मध्ये दिली आहे.

भारतीय लोकसंख्या १००% त्यात श्रीमंत ३%, मध्यमवर्गीय ५७% ह्या मध्यमवर्गीयांपैकी २०% उच्च मध्यमवर्गीय (मासिक उत्पन्न २०,००० पेक्षा जास्त), २०% मध्यम मध्यमवर्गीय (दहा हजार ते पंधरा हजार ह्यांच्या दरम्यान मासिक उत्पन्न), तर ६०% कनिष्ठ मध्यमवर्गीय (मासिक उत्पन्न दहा हजाराच्या आत, पण गरीब नाहीत), उरलेले ४०% गरीब शेतीवर जगणारे, गिरीश वासूदेवांनी अधिक तपशील दिलेला नाही पण तो पुढीलप्रमाणे मांडता येईल.

अतिश्रीमंत ३ करोड, उच्चमध्यमवर्गीय ११ करोड ४० लाख, मध्यम मध्यमवर्गीय ११ करोड ४० लाख, कनिष्ठ मध्यमवर्गीय ४३ करोड २० लाख तर दरिद्री व गरीब ४० करोड. ह्यातील कनिष्ठ मध्यमवर्गीय लोकांना आपण कधी एकदा उच्च वर्गात प्रवेश करतो असे झाले आहे म्हणजे ६०% लोक आज हे सरळ सरळ प्रस्थापित झालेले किंवा व्हायला निघालेले आहेत. ह्यातील कनिष्ठ मध्यमवर्गीय लोकांपैकी काहींनी गरीब मानले तर ही लढाई ५०% विरूध्द ५०% अशीच आहे.

ह्या आकडेवारीच्या पार्श्वभूमीवर मध्यमवर्गीय साहित्याला आपण साडेतीन टक्क्याचे साहित्य म्हणू शकू काय? ह्याचा अर्थ ज्याला आपण मेन स्ट्रीम म्हणतो ते आता प्रामुख्याने मध्यमवर्गीय किंवा दलीत असे दोनच प्रकारचं साहित्य आहे. काळाने घडवलेला हा बदल आम्ही लक्षात घेणार आहोत काय? ह्याचा अर्थ सदाशिवपेठी साहित्याचा मी पुरस्कार करतो आहे असे नाही. सदाशिवपेठी साहित्य हे केवळ मध्यम वर्गीय नव्हते तर ते ब्राम्हण वर्णीय होते. थोडक्यात वर्णव्यवस्थेचे समर्थन करणारे साहित्य आपण मोडीतच काढले पाहिजे पण मध्यम वर्गीय साहित्याला मात्र एकदम मोडीत काढणे आता परवडणारे नाही. त्याचा विचार आता वेगळ्या पध्दतीने करायला हवा. त्याचबरोबर पूर्वी वर्णीय संवेदनशिलतेला ओलांडून जाणारे जे मध्यमर्गीय साहित्य आहे त्याची मांडणी कशी करायची ह्याचा विचार हवा. जुन्याच वर्गसंघर्षाच्या चिपळ्या वाजवत बसणाऱ्या मार्क्सवाद्यांना हे समजायचे नाही पण समर खडस, संजय पवार ह्या सारख्या तरुण मंडळींनी आमच्या ह्या मुद्यांचा जरुर विचार करावा. अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण हे प्रत्येकाला मिळायलाचं हवे पण हे प्रत्येकाला मिळवून देण्यासाठी पारंपरिक लढ्याच्या पध्दती बिनकामाच्या आहेत. हे आम्हां लोकांना जेवढ्या लवकर समजेल तितकं बरं. अन्यथा विद्रोही साहित्यसंमेलनात केवळ जोशपूर्ण आणि टाळ्या घेणारी भाषणे आपण करत राहू आणि समाज साहित्याला आपल्या नेहमीच्या शैलीत सरपास करून पुढे निघून जाईल. ५० टक्के मध्यम/ श्रीमंत वर्गाविरूध्द ५० टक्के दलीत वर्ग संघर्ष करतील हा भ्रम आहे आता वर्गसंघर्षाऐवजी वेगळेच समोजान्नती राजकारण समाजकारण खेळायला हवे. ह्या संमेलनात मुस्लिम मूलतत्ववादाविरोधी कोणीच आवाज काढलेला नाही. आमच्या मते विरोध सर्वच प्रकारच्या मूलतत्ववादाला हवा. पुढील साहित्य संमेलनाबाबत आमची मंडळाला सूचना अशी की जर पुढील वर्षी त्यांना ठाकरेसारख्या हुकूमशाही प्रवृत्तींशीच सख्य करायचे असेल तर त्यांनी पुढील संमेलनात श्री. बाळासाहेब ठाकरे ह्यांनाच संमेलनाचे अध्यक्ष करावे. आम्हाला खात्री आहे बाळासाहेब आपल्या सैनिकांना कलावंताना कसे ठोकून काढायचे त्यासाठी कोणते साहित्य वापरायचे कोणते साहित्य अंगावरून उतरवायचे ते कसे जमा करायचे ह्याबाबत योग्य ते मार्गदर्शन करून साहित्याला मूलभूत अर्थ प्राप्त करून देतील.

**श्रीधर तिळवे**

# श्रीधर तिळवे यांच्या कविता

## १. क्रांति

सर्वच क्रांत्यांवरचा विश्वास
गळून गेलाय केसासारखा
आता मला खणखणीत टक्कल पडलय
आणि हे लोक उभे
आयडॉलॉजींचे जुने कंगवे घेऊन

बाहेर सर्वत्र केसच उगवतायत इंडिविज्युलीझमचे
कमीटमेन्टचा झालाय शिमगा
आणि हेअर ड्रेसर्स व ब्युटीपार्लर्सच्या रांगोळ्या गल्लोगल्ली
दिवाळसण साजरा होत असल्यासारखा
परवा तर एकानं वीगच आणून दिला
मी खूबसूरत दिसावं म्हणून
माझं बोडकं झालेलं अंग तर
सहन होत नाही आरश्यालाही
आणि केस दाखवल्याशिवाय
तुम्ही अस्तित्वात आहात हेच स्वीकारत नाहीत लोक आताशा

सारे केस गळून गेलेला महामानव
सर्वत्र केस मिरवणारे महामाकड
सारा प्रवासच मुरत पडलाय लोणच्यासारखा
उत्क्रांतित
आणि क्रांति नागड्यानेच पळून गेलीये शतकातून
झ्याटाएवढाही पुरावा न ठेवता माझ्यातून

## २. मी

मी डावीला वळसा घालून
उजवीकडे पोहचलोय
उजवीला सुलट करून
तिला माणसासारखी उभी केलीये
आता मी ना डावीसारखा
ना उजवीसारखा
मला पाहायचं असेल तर
तुम्हाला सर्वत्रच पहावं लागेल

## ३. कार्ल मार्क्स

तू मेलास
ह्याचं दु:ख नाही
(तू मरणारच होतास आपल्या कर्मानं)
भांडवलदार सोकावतील
ह्याचं दु:ख आहे
तू होतास
मानवतेने दिलेली धमकी होती
तू होतास
न्याय हिसकावला जाण्याची दहशत होती
तू मेलास
विरोध मेला
विकासही मेला
आता आहे ती प्रगती
एनवॉयरनमेंट खात सुटलेल्या व्हेजिटरीयन डॉयनॉसर सारखी
ज्युरॅसिक पार्कमध्ये सेमिओटीकली वाढणारी
ज्युरॅसिक पार्कमध्ये सेमीओटीकली तुला गाडणारी.

## ४. धोखा

त्यांचे चेहरे भगवेच आहेत
पूर्वी कधी भगवे नव्हते?
त्यांचे चेहरे हिरवेच आहेत
पूर्वी कधी हिरवे नव्हते?
तो निसर्ग शहाणा
त्याने माणसे ना हिरवी बनवली ना भगवी
कदाचित म्हणूनच
मी माणूस म्हणून जिवंत आहे
कदाचित् म्हणूनच
मला माणूस म्हणून धोखा आहे.

## ५. दु:ख

त्यांनी माझी कविता पेटवली
मला दु:ख नाही
त्यांनी माझी पाठ पुरवली
मला दु:ख नाही
दु:ख ह्याचे कि

ह्या सतीप्रथेला तुम्ही सर्वच साक्षी होता
दु:ख ह्याचे कि
तुम्ही ह्या सतीचे आता मन्दीरही बांधताय.

## ६. मुक्ती

विठ्ठलाला चार शिव्या दिल्या
विठ्ठल चळला नाही
हे चळले
अल्लाहला उद्दाम चॅलेंज दिले
अल्लाह ढळला नाही
हे ढळले
हिंदूंनी भगव्या काठ्या उचलल्या
मुसलमानांनी हिरव्या
मार पडला पाठीवर
तर पाठीचीच वीट झाली
आणि पंढरपूर पाठीवर टाकून
अल्लाह निघून गेला इंद्रायणीच्या दिशेने
बुडण्याचा आवाज झाला
कयामत तरुन आली गाथेसारखी
ज्यांना वाचता न आली ते आंधळे झाले
ज्यांनी वाचली ते मोक्षाला मिळाले.

## ७. झाड

अपेक्षा नव्हतीच
मराठी साहित्यीक ते काय लढणार
सगळे पुचाटच
पुठ्ठयाचा वाघ आणि कागदाची कविता
कागदाने पुठ्ठयाला चॅलेंज दिले
पुठ्ठ्याने कागदाला कॉर्नर केले
ह्या सगळ्या गदारोळात
ते कुणालाच नाही दिसले
जे एक झाड कायमचेच नाहीसे झाले.

## ८. मित्रास

मित्रा,
फिरायचय माघारी?
फिर माघारी
कर माफीपत्राची उतारी
सामन्याच्या पहिल्याच पानावर
शब्दांचे शस्त्र होण्याचे दिवस संपलेत केव्हाच
शब्द आहेत आता फक्त केवळ एक बातमी
जी ह्या काळोखात वाचत नाही कोणीच
कवीसुध्दा.

## ९. फन

सगळेच त्यांना जाऊन मिळाले
हे ठीकच
तू फितूर झालीस
हे वाईट
तू होतीस वीट
माझ्या पायाखालची
तू काढून घेतली गेलीस
आणि मी आदळलो पाठीवर
दाणकन्
मग बाकी होते फक्त उचलणे गन
ते काम सगळ्यांनीच इमान इतबारे केले
आणि मी शांतपणे मारला गेलो
एक पॉलिटिकल फन समजून
फणा न काढता
रक्त न सांडता

## १०. नशीब

आता ते क्रूसाकडे वळलेत
छान आहे
पूर्वी क्रूस त्यांच्याकडे वळला होता
मानवतावादाची राजकीय खेळी म्हणून
आता राजकीय खेळीच मुळावर आलीये क्रूसाच्या
म्हणाणारे म्हणतात कि
जिझस त्या रात्री म्हणे क्रूसावररून उतरून
थेट कश्मिरात आला
कदाचित् आता मारला गेला असेल अतिवाद्यांकडून
कश्मिरात, गुजरातेत किंवा ओरीसात
एकंदरीत काय
आमच्या नशीबी जिझसचा क्रूस होता
जिझस नव्हता असंच म्हणायचं.

## ११. काफीर

तूच एकमेव प्रेषीत असशील
तूच जर अंतिम असशील
तर मी काफीर आहे

तुझ्या कुराणाच्या बाहेरुनही
माझे आयुष्य वहात जाते
आणि हे म्हणतात
तू कुराणात रहा
तू म्हणालास की
'खुदा काय कंजूस आहे फक्त मलाच पैदा करायला
तो चाहील तर माझ्यानंतरही लाखो प्रेषीत होतील'
तुझी ही कथा गळून गेलीये कुराणातून
आणि तुझ्या डोळ्यांची करूणा घेऊन
ह्यांनी मांडलाय फन्डामेन्टलिझमचा सत्ताबाज धंदा
मीही खुदाचा बन्दा आहे म्हटल्यावर
मी हिन्दूचाच बेटा म्हणून
रोखलेत माझे डोळे
जे तुझ्यापलीकडलं पाहतानाही
तुलाच पहात होते
बायकांना न्याय देताना
जन्मानंतर मारल्या जाणाऱ्या मुलींना कवळताना
तुझ्या हातालाही झाली होती हिंसेची जखम
आता त्या जखमेचाच जिहाद करून
हे तुझ्याच पोरी त्या जखमेत नांदवतायेत
तलाकात पिचवतायत
बुरख्यात गायबवलायत
ह्यांनी सर्वक्रमपणे तुला बळकावल्यावरही
मी घसा फोडून ओरडलो
सर्वत्र अल्लाच आहे
कुराणातही अल्ला कुराणाबाहेरही अल्लाच
बुरख्यातही अल्ला बुरख्याबाहेरही अल्लाच
त्याच्या मर्जीशिवाय पानही हलत नाही
तर त्याच्या मर्जीशिवाय हे कम्प्युटर कुठून येतील
टिव्ही कुठून येतील
जे बदलत नाही तेही अल्ला
जे बदलतं तेही अल्ला
हा कम्प्यूटर अल्ला
हा टिव्हीही अल्लाच
तर तुझेच वचन परजून
ह्यांनी मला फाडला
कुराणाबाहेर गाडला
कुराणाचे निमित्त करून

आता कब्रस्तानात दफनायला मनाई म्हणून
मी प्रार्थना करतो आहे कब्रस्तानाबाहेरून
'हे खुदा हे अल्लाह
इन्हे समझा दो
इन्हे माफ कर दो
क्यूं कि ये नही जानते
मारनेवालाभी तू
मरनेवालाभी तू'

तू म्हणालास
अल्लाह सर्वत्रच आहे
मी म्हणालो
मग मीही अल्लाच आहे
कारण त्या सर्वत्राशिवाय मी कुठे अस्तित्वात आहे

तूच एकमेव प्रेषीत असशील
तूच जर अंतिम असशील
तर मी काफिर आहे.

## १२. कारण मी जाणतो

मला उर्दू आवडते म्हणून
मी हिंदूत बाटगा आहे
मला मराठी झपाटते म्हणून
मी मुसलमानात काफिर आहे

भाषादेखील धर्मात वाटणाऱ्यांना कसे कळणार
अल्लाह सर्वत्रच आहे
ब्रम्ह सर्वत्रच आहे

मी उर्दूत अल्ला असतो
मराठीत ब्रम्ह
कारण मी जाणतो
दोन्ही एकच आहेत.

***

# ज्ञानदाच्या कविता

१.

सारं काही जुनंच आहे
ही माझ्या आतली कविता देखील
हा हुंगतेय तो प्राणवायू
ही हजारो वर्षांपूर्वीची माती
हे निळंभोर थंड पाणी कधी पाऊस तर कधी
ढग होणारं...
हे सारं काही जुनंच आहे, कात टाकून नवं होताना.
मी जर बाराव्या शतकात आले असते नं जन्माला
तर मी ओव्या लिहिल्या असत्या नाहीतर
ढवळे लिहिले असते त्या अगोदर महदाईसे सारखे...
सोळाव्या शतकात मी अभंग लिहिले असते
डोळ्यातली इंद्रायणी ओथंबून जाताना
आणि एकेक मणका उगाळला असता
कवितेसाठी विठोबाच्या सहाणेवर
अठराव्या शतकात मी लावण्या लिहील्या असत्या लवथवत्या
पानिपतानंतरच्या पुण्यात...
श्री नाना फडणवीसांची अकरावी बायको असते
तरीही मी घुसमटत्या कविता लिहिल्या असत्या
थरथरत्या हातानं
मी कुणबीण असते पेशव्यांच्या वाड्यावर तरीही.
माझ्या रक्तातलं गाणं मी आपोआप म्हटलंच असतं
जात्यावर दळताना, पोराला निजवताना किंवा रंडिखान्यातही
ही माझ्या आत्माच्या बुंध्याला लपेटलेली
सर्पीण कविता कुठेही उमटलीच असती सळसळत
प्रत्येक माझ्या शब्दात
मीरेच्या भिनलेल्या विषासारखी.

२.

संधिवाताच्या दुखणाऱ्या बोटांवर
आशेनं आयोडेक्स चोळावं तितकं निरर्थक
या ठसठसणाऱ्या माझ्या मनाला मी कविता फासू बघते
मान सगळ्याचा राग कडवट दाटून येतो...
या घडवलेल्या बाईपणाचा दु:स्वास करताना
का सावरते मी खांद्यावरचा पदर? असं वाटून स्वत:चाही राग येतो
ही भाषा पण परकी वाटते पुरुषी डोळ्यासारखी
आपल्या नकळत आपल्याला घडवण्याचे हक्क
भूतकाळाकडे गहाण पडले त्याचाही...
या झुंजीला बहुधा काही अर्थ नाही.
मला तरीही दिसते ही विराट माया कविता
पुरुषार्थाला कुशीत घेऊन पाजत बसलेली.

३.

दिलीप ट्युलिप
बाग लांबलचक फुलांची बाग
चित्रं जहांगिर समोव्हर एलिट एलिट... वेडे कुठचे
स्यूड - पी सायलेंट
हातातली कॉफी!

वारसाहक्कानं मिळालेलं
बापाचं मरण
माडगूळ, उजळंब, घाटनांदूर अशी आजोळं.
ही यडी मराठी, कविता, जिभेचं वळण आणि द ग्रेट.
सदाशिवपेठ... नरक... रौरव की कुंभीपाक?
दॅट् इज द क्वश्चन!
हे मध्यवर्गीय मूर्ख मुली
शिक्षण कॉलेजातलं म्हणजे सर्वस्व नाही
तो उमदा इंजिनिअर नवरा म्हणजेही नाही
ही गुटगुटीत पोरं तर तेही नाही...
ही एशियाटीक मधली पुस्तकं म्हणजेही नव्हे... गडे...
सर्वस्व म्हणजे ही आठवणींची बाग
तिला जाग!

वैदिकाश्रमातली गळकी खोली... धुवाँधार पाऊस...
चिप्पं आठवणी ओल्या अंगाला चिकटून...
सपाटून खाल्लेला मार पसरलेलं भोकाड...
आईबाबा काका मोठीआई
मी एक प्रचंड कोळी आहे या
आठवणींच्या जाळ्यात आडकलेला.

४.

मी लिहिते आहे
कोणत्याशा ग्रॅनाईटच्या ॲटम्सनी
माझ्या कलकलत्या काळजाचं
ॲब्झर्ड होत जाणाऱ्या शब्दांनी गाणं.

माझ्या उण्यापुऱ्या प्रेमाच्या फार्स मध्ये
जगण्याच्या सेव्हन कोर्स डिनरचा
दुसरा कोर्स सेक्शुअली रिचवताना
मी अशाच हॉटेलात
अशीच गळ्यापर्यंत पोटभर आश्वासनं
गिळत
उष्टावलेल्या शरीरानं थांबले होते
अदमास घेत
की इथं मला या शरीरात पूर्ण गायब होण्याच्या
शक्यता आहेत का? हे आजमावत
माझ्या सराईत नजरेनं
तुझाही एक अंदाज घेतीए
त्यापेक्षा तुझी चव कितीशी निराळी असेल याचा
मला
प्रेम
कधीच
कळलं नाही
आणि कळवळून भूक लागल्यावर
मी ध्यानात त जाता
सिन्सियर जंक गिळतीए.

५.

स्वत:वरचा सारा विश्वास अंतरला
तरी
परमेश्वरा
शिलकीत आत्महत्या ठेव
हे सुंदर जगणं
एकमेकांना अवघड आणि अशक्य बनवणाऱ्या
या दिवसात
सारे संबंध तोडताना
आतात केवळ शांतता ठेव
व जावून घे तुझ्या लोहारी फुफ्फुसातून
माझे वाजणारे श्वास
आणि मग पाटी कोरी कर
नवा जन्म लिहिण्यासाठी

६.

तू 'तू' म्हणून राहात नाहीस
तू होतोस माझ्या खांद्यावरचा आश्वासक हात
माझ्या बापाच्या स्वेटरचं माप
तू प्रियकर होतोस आणि हातावरची भाग्यरेषा उजळते
तू नुसता दगडात नसतोस
पक्का आधारच होतोस, माझ्या पायाखालची वीट
सरकते तेव्हा
माझी फेमिनिस्ट तडफड चालू असते.
मला तुझ्यावाचून करमत नाही
तुझा आधार घेववत नाही...
तुला पूर्ण देता येत नाही
तुला पूर्ण घेता येत नाही
दरम्यान थिअरी
दरम्यान तत्वज्ञान
माझ्या योनिकाठचा आनंदही माझ्या मेंदूत म्यान...

७.

हळूच नात्यातून मागच्या मागं पळून जा
पाय न वाजवता
हळूहळू श्वासानं पुन्हा विश्वाशी जोडून घे
हळूहळू
आपल्या तहानेचा आकार असलेलं नातं
पाण्यात विरघळताना बघ
हळूहळू
आतला अहंकार त्यांच्यातून विलग कर
त्याला कापरासारखा जाळ
हे वर्तमान ओझं
हा नात्यांचा कोलाहल
हे एकटेपणाचे आघात
डिप्रेशन आणि ताण
यावर हळूहळू
मात करायची तर
श्वासातून शून्यात जा
आता हा भवतालचा प्रदेश गडे
तुझ्या उपयोगाचा नाही.

# भारतीय शिक्षणव्यवस्था आणि मराठी माध्यमाचा प्रश्न (भाग ३)

**श्रीधर तिळवे**

भाषेप्रमाणे ध्वनी निर्णयन व सौष्ठव निर्णयनही व्यवहारात तितकेच प्रचलित असते. किंबहुना भाषेपेक्षा जास्त प्रचलित असते. हे लक्षात घेतले की मर्ढेकरांचा, भाषा व्यावहारिक साधन असते म्हणून भाषिक कलांना दुय्यम ठरविण्याचा, प्रयत्न किती फोल आहे हे सहज लक्षात येईल. प्रत्यक्ष जगताना ध्वनीसौष्ठवचिन्हांची आपणाला इतकी सवय झालेली असते की चित्रकला किंवा शिल्पकला ह्यातील सौष्ठव आस्वादताना अनेकदा ही सवय आड येते. केवळ शब्दच वापरून वापरून गुळगुळीत व शिळे झालेले नसतात तर वस्तूंची सौष्ठव चिन्हे (ह्यात रंगही येतात) व ध्वनी चिन्हेही वापरून वापरून शिळी व गुळगुळीत झालेली असतात. किंबहुना शब्दापेक्षा सौष्ठव अधिक सवयीचे असते. त्यामुळे मर्ढेकरांची कसोटी लावायची ठरवली तर सौष्ठवकला अधिक दुय्यम होतील. (माणूस प्रथम डोळे उघडतो, प्राणी डोळे उघडू शकत नाही हे एक जीवशास्त्रीय सत्य आहे) तसेच नेमाडे म्हणतात त्याप्रमाणे भाषेला अधिक खोली वगैरे काही नसते. सौष्ठव व ध्वनी हेही व्यावहारिक असतात. भाषेचे नेमाडेंनी (१) व्यवहार भाषा (२) शास्त्र भाषा (३) साहित्य भाषा असे स्तर कल्पलेत. सौष्ठव व ध्वनीलाही हे तीन स्तर आहेत. (१) व्यावहारिक सौष्ठव व ध्वनी (२) शास्त्रीय सौष्ठव व ध्वनी (गणित व भूमिती तर पूर्णपणे ह्यावरच उभी आहेत). आधुनिक काळात शास्त्र भाषेने शिकवण्याबरोबरच चित्रपट व टीव्हीपट यांच्या साहाय्यानं शिकवणं हे अधिक फळदायी मानतात. प्रयोगशाळेतील शास्त्रीय प्रयोग तर सौष्ठव व ध्वनिप्रधानच असतात. केमिकल्स कशी ओळखायची किंवा निळा लिटमस तांबडा होणं वगैरे गोष्टी सौष्ठवावरच अवलंबून असतात. भौतिकशास्त्रात ध्वनी महत्त्वाचा असतो. (३) कलासौष्ठव (ह्यात शिल्प, चित्र, फिल्म, नाटक, नृत्य वगैरे कला येतात.) व कलाध्वनी (ह्यात संगीत येते). सांगण्याचा मुद्दा इतकाच की, नेमाडेंनी मानवी जीवनात भाषेला दिलेले केंद्रीयस्थान चुकीचे वाटते. साहित्य हे जसे व्यावहारिक भाषेची उन्निर्मिती (हा शब्द मी प्रभाकर पाध्येंच्या 'सौंदर्यानुभ' ह्या ग्रंथातला वापरतोय) आहे. तसेच शिल्पचित्र ह्या कला व्यावहारिक सौष्ठव चिन्हांची फिल्म, नाटक ह्या कला व्यावहारिक घटना चिन्हांची; नृत्य, अभिनय ह्या कला व्यावहारिक देहमुद्रांची उन्निर्मिती आहे. साहित्यात जसे काव्य आणि गद्य असे दोन प्रकार होतात तसेच शिल्पकलेत शिल्प व पुतळा, चित्रकलेत पेंटिंग व कमर्शिअल डिझाईन व फोटोग्राफी, देहकलात नृत्य व अभिनय, फिल्ममध्ये चित्रपट व डॉक्युमेंटरी असे दोन प्रकार होतात. रेगेंनी पॉल व्हॅलरीचे कोटेशन छांदसीमध्ये दिले होते. त्यांच्या मते गद्य म्हणजे चालणे आणि काव्य म्हणजे नृत्य करणे होय. प्रत्यक्षात हे मत अत्यंत चुकीचे आहे. ते दुरुस्त करून मी म्हणेन की गद्य म्हणजे अभिनय व काव्य म्हणजे नृत्य होय. चालणे हे व्यावहारिक आहे. अभिनय हे उन्नयन आहे. नेमाडे म्हणतात तसे गद्य हे व्यावहारिक भाषेने युक्त असते हे वरकरणी सत्य वाटले तरी प्रत्यक्षात अभिनय जसा नेहमीच्या चालण्या - बोलण्याचे, वागण्याचे उन्नयन होऊन जन्मतो तसेच गद्यही व्यावहारिक भाषेचे उन्नयन होऊन जन्मते. देह एरवीही व्यवहारात संदेशवहन करत असतोच तसेच भाषाही संदेशवहन करत असते. दोन्हींचेही कलेत उन्नयन होते. हे उन्नयन जेव्हा त्या त्या कलेतील माध्यमाचे व्याकरण मोडीत काढते तेव्हा माध्यम आणि आशय यांच्यात पूर्ण अद्वैत होते. आणि अशा अद्वैती कला त्या त्या कला प्रकारात तीव्र वाटतात. ह्या न्यायानेच नृत्य अभिनयापेक्षा, पेंटिंग कमर्शिअल पेंटिंगपेक्षा, शिल्प पुतळ्यापेक्षा, चित्रपट डॉक्युमेंटरीपेक्षा, शास्त्रीय संगीत भावगीतापेक्षा, बॅले नाटकापेक्षा आणि काव्य गद्यापेक्षा तीव्र वाटते. ह्या सर्व अद्वैती कला भाषेचे, सौष्ठवाचे, स्वरांचे, घटनांचे व्याकरण हवे तसे मोडतात, वाकवतात. आपण ह्यानुसार कलांचे खालीलप्रमाणे वर्गीकरण करू शकतो.

(क्रमशः)

| कलाप्रकार | अद्वैती | युग्म | विशिष्टाद्वैती | द्वैती |
|---|---|---|---|---|
| साहित्य | काव्य | कादंबरी,कथा,लघुनिबंध | नाटकाची शब्दसंहिता | निबंध चरित्र |
| चित्र (द्विमिती सौष्ठव) | पेंटिंग | कमर्शिअल पेंटिंग वा फोटोग्राफी | विणकाम भरतकाम | कमर्शिअल फोटोग्राफी |
| शिल्प (त्रिमिती सौष्ठव) | शिल्प | आर्किटेक्चर पुतळा | नेपथ्य सेट | कमर्शिअल आर्किटेक्चर |
| संगीत | वाद्यसंगीत शब्दशून्य कंठसंगीत | कंठसंगीत (शास्त्रीय) | शब्द प्रधान गायकी | पार्श्वसंगीत |
| अभिनय | नृत्य | मुकाभिनय | नाट्याभिनय | चित्रपटाभिनय |
| घटनाकला (चित्रपट, नाटक वगैरे) | घटनापट (घटनापटालाच चित्रपट म्हणता येईल) | नृत्य व नाटक | जाहिरातपट, पथनाट्य | वृत्तपट, माहितीपट |